राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत मे. जे. के. ट्रस्ट, ठाणे या शेतकऱ्यांच्या दारात गाई-म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देणे या प्रकल्पास प्रशासकीय मंजुरी प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/ प्र.क्र. ३०४/ पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २७ एप्रिल, २०१५**

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. राकृवि - २००९/ प्र.क्र. ३२३/ पदुम-४, दि. १७.१०.२०१२.

२) शासन निर्णय क्रमांकः आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-११(१०)/ सी.आर. ८९०/पसं-६/२०१०, दि. १६.०३.२०१५.

३) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००९/प्र.क्र. ३२२/पदुम-४, दि. २०.०६.२००९.

४) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-१२/ आरकेव्हीवाय/सी.आर ९८५/२०१३, पसं-६, दि. १६.०४.२०१५.

५) शासन पत्र क्र. संकीर्ण-२००९/प्र.क्र. ३०४/पदुम-४, दि. ०६.१२.२०१४.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत वाचा -१ येथील शासन निर्णयानुसार सद्य:स्थितीत राज्यात पशुवैद्यक पदवीधर / पशुवैद्यक पदवीकाधारक व इतर सुशिक्षित बेरोजगारांमार्फत शेतकऱ्यांच्या दारात गायी-म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहेत. आयुक्त पशुसंवर्धन यांनी सेवादात्यांमार्फत पुरविण्यात येत असलेल्या कृत्रिम रेतनाचे कार्य समाधानकारक नसणे, प्रति वासरू जन्मण्यासाठी जास्त कृत्रिम रेतने लागत असणे आणि प्रति वासरू निर्मितीसाठी येणारा खर्च जास्त असल्याच्या बाबी शासनाच्या निदर्शनास आणून दिलेल्या आहेत. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या दि. १९.१२.२०१४ रोजी नागपूर येथे पार पडलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या सभेमध्ये कृत्रिम रेतनाचे कार्य हे सेवादात्यांमार्फत तसेच, स्वयंसेवी / सेवाभावी संस्था/ विश्वस्त संस्थांमार्फत करण्याबाबत चर्चा होऊन निर्णय झालेला आहे. त्यानूसार, अशा स्वयंसेवी / सेवाभावी संस्थांकडून वाचा

५ येथील पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांच्या स्तरावरून इच्छापत्रे मागविण्यात आली असता, मे. जे.के. ट्रस्ट, ठाणे या एका निविदाकाराकडून दरपत्रके प्राप्त झाली आहेत. सदर प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, यांनी वाचा-४ येथील पत्रान्वये तांत्रिक मंजुरी प्रदान केलेली आहे. त्या अनुषंगाने, १२ व्या पंचवार्षिक योजनेच्या उर्वरित कालावधीत म्हणजेच दि.३१.०३.२०१७ पर्यंत जे.के. ट्रस्ट, ठाणे या सेवाभावी संस्थेमार्फत कृत्रिम रेतन केंद्रे स्थापन करून त्यांचेमार्फत शेतकऱ्यांच्या दारात गायी-म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देणे या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत वाचा -१ येथील शासन निर्णयानुसार सद्य:स्थितीत राज्यात पशुवैद्यक पदवीधर / पशुवैद्यक पदवीकाधारक व इतर सुशिक्षित बेरोजगारांमार्फत शेतकऱ्यांच्या दारात गायी-म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहेत. आयुक्त पशुसंवर्धन यांनी सेवादात्यांमार्फत पुरविण्यात येत असलेल्या कृत्रिम रेतनाचे कार्य समाधानकारक नसणे, प्रति वासरू जन्मण्यासाठी जास्त कृत्रिम रेतने लागत असणे आणि प्रति वासरू निर्मितीसाठी येणारा खर्च जास्त असल्याच्या बाबी शासनाच्या निदर्शनास आणून दिलेल्या आहेत. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या दि. १९.१२.२०१४ रोजी नागपूर येथे पार पडलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या सभेमध्ये कृत्रिम रेतनाचे कार्य हे सेवादात्यांमार्फत तसेच, स्वयंसेवी / सेवाभावी संस्था/ विश्वस्त संस्थांमार्फत करण्याबाबत चर्चा होऊन निर्णय झालेला आहे. त्यानूसार, अशा स्वयंसेवी / सेवाभावी संस्थांकडून वाचा ५ येथील पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांच्या स्तरावरून इच्छापत्रे मागविण्यात आली असता, मे. जे.के. ट्रस्ट, ठाणे या एका निविदाकाराकडून दरपत्रके प्राप्त झाली आहेत. सदर प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, यांनी वाचा-४ येथील पत्रान्वये तांत्रिक मंजुरी प्रदान केलेली आहे. त्या अनुषंगाने, १२ व्या पंचवार्षिक योजनेच्या उर्वरित कालावधीत म्हणजेच दि.३१.०३.२०१७ पर्यंत जे.के. ट्रस्ट, ठाणे या सेवाभावी संस्थेमार्फत कृत्रिम रेतन केंद्रे स्थापन करून त्यांचेमार्फत शेतकऱ्यांच्या दारात गायी-म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देणे या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | प्रति वासरु निर्मितीसाठी जे.के. ट्रस्ट, ठाणे यांचे मान्य केलेले दर |
|---|---|---|
| १ | चंद्रपुर, गडचिरोली, ठाणे, पालघर, रायगड, सिंधुदुर्ग व रत्नागिरी | रु. ३,०००/- |
| २ | धुळे, नंदुरबार, जळगाव, परभणी, नांदेड व हिंगोली | रु. २,५००/- |
| ३ | अकोला, बुलढाणा, यवतमाळ, औरंगाबाद, जळगाव,भंडारा व गोंदिया | रु. २,०००/- |
| ४ | अमरावती, जालना, नागपूर व वर्धा | रु. २,२००/- |
| ५ | वाशिम, बीड, उस्मानाबाद, व लातुर | रु. १,८००/- |

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी एम.आर. सॅक किंवा इतर संस्थेशी तात्काळ संपर्क साधून राज्यातील सर्व तालुक्यांचे नकाशे तयार करून प्रजननक्षम गाई / म्हशींच्या संख्येनुसार गावे निश्चित करावी व कोण-कोणत्या गावात शासनाच्या पशुवैद्यकीय संस्थेमार्फत, पशुवैद्यक पदवी / पदविकाधारक सेवादात्यांमार्फत व जे.के. ट्रस्ट या संस्थेमार्फत कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून दिल्या जातील याचा आराखडा तयार करावा व त्या अनुषंगाने, केंद्र शासनाकडून राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत या कार्यक्रमासाठी मंजुर केलेला निधी व उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधीन राहून पशुवैद्यक पदवी / पदवीकाधारक सेवादाता तसेच, जे. के. ट्रस्ट या संस्थेची किती केंद्रे स्थापन करावयाची, हे निश्चित करावे.

२. या प्रकल्पाचे सनियंत्रण अधिकारी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे रहातील तर प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला हे असतील.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी इच्छापत्रे मागवित असताना त्यामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती, प्रस्तूत शासन निर्णयात नमूद केलेल्या बाबी, केंद्र शासनाच्या या संदर्भातील मार्गदर्शक सुचना तसेच, प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी आवश्यक बाबींचा समावेश करून आयुक्त पशुसंवर्धन यांनी जे.के.ट्रस्ट या स्वयंसेवी / सेवाभावी संस्थेसमवेत सामंजस्य करार (MOU)करावा.

४. कृत्रिम रेतन कार्यासाठी शासन निर्णय क्र. एआयएस-१००५/ प्र. क्र. ५५३/ पदुम-४ दि. १७.०४.२००६ अन्वये शेतकऱ्यांकडून जमा केलेल्या रु. २१/- सेवाशुल्कापैकी रु. २०/- चा भरणा

मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचेकडे व रु. १/- चा भरणा आयुक्त पशुसंवर्धन यांच्या सुचनेप्रमाणे पशुसंवर्धन विभागामार्फत शासन कोषागारात करण्यात यावा. तसेच, भविष्यात सदर सेवाशुल्कात वाढ झाल्यास त्याप्रमाणे सेवाशुल्क जमा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५. जे.के. ट्रस्ट या संस्थेने जिल्ह्यात शासन निर्णय क्र. एलव्हीएस-२०१०/ प्र.क्र. १९८/ पदुम-४, दि. १४ मे, २०१० अन्वये विहित केलेल्या शासनाच्या पैदाशीच्या धोरणानुसार कृत्रिम रेतन कार्य करणे बंधनकारक राहील.

६. जे.के. ट्रस्ट ही संस्था कृत्रिम रेतन कार्यासाठी ज्या गोठित रेत मात्रा खरेदी करणार आहे, त्या संस्थेतील वळुंची वंशावळी आयुक्त पशुसंवर्धन तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी उपलब्ध करून घ्यावी व या कार्यक्रमांतर्गत उच्च वंशावळीच्या वळुंच्या गोठित रेत मात्रांचा वापर होईल, असे पहावे.

७. कृत्रिम रेतनासाठी आवश्यक असलेल्या सर्व बाबींची खरेदी व उपयोग केंद्र शासनाच्या स्टँडर्ड ऑपरेटींग प्रोसिजर (SOP) अंतर्गत विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात यावा.

८. जे.के. ट्रस्ट या संस्थेकडून केलेल्या कृत्रिम रेतनापासून जन्मलेल्या संकरित वासरांची व म्हशींच्या सुधारीत पारडयांची १०० टक्के पडताळणी नजीकच्या पशुवैद्यकीय संस्थेवरील अधिकारी / कर्मचारी यांनी करावी व त्यांनी तसे प्रमाणित केल्यानंतर प्रती वासरू निर्मितीसाठीची देय रक्कम जे.के. ट्रस्ट या संस्थेस अदा करण्यात यावी.

९. जन्मलेल्या वासरांचा १००% पडताळणी अहवाल संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांनी संबंधित प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांचे मार्फत आयुक्त पशुसंवर्धन यांना सादर करावा व आयुक्त यांच्या अहवालानुसार व मागणी प्रमाणे महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ यांनी देय रक्कम धनादेशाद्वारे आयुक्त पशुसंवर्धन यांचेमार्फत जे.के. ट्रस्ट या संस्थेस अदा करण्यात यावी.

१०. जे.के. ट्रस्ट या संस्थेकडून करण्यात आलेल्या कृत्रिम रेतनांची नोंद नजिकच्या पशुवैद्यकीय संस्थेकडे १ महिन्याच्या आत करावी. अशा कृत्रिम रेतना नंतर जन्मलेल्या वासरांसाठी देय रक्कम मिळण्यासाठीचा दावा सोबतच्या **परिशिष्ट "अ"** या विहीत नमुन्यात करावा व त्याची पडताळणी नजिकच्या पशुसंवर्धन विभागाच्या संस्थेतील अधिकाऱ्यांनी करावी. सदर दाव्यावर जन्मलेल्या वासराचे त्याच्या मालकासोबत छायाचित्र असणे बंधनकारक आहे. कृत्रिम रेतनापासून जन्मलेल्या वासरांसाठी द्यावयाची रक्कम मागणी केल्यानंतर ३० दिवसांच्या आत त्यांनी केलेल्या कामाची पडताळणी नजिकच्या पशुवैद्यकीय संस्थेमार्फत / पशुधन विकास

अधिकारी (विस्तार) यांनी करून त्यांना देय असलेली रक्कम देण्यासाठी जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्याकडे अहवाल सादर करण्यात यावा.

११. जे.के. ट्रस्ट या संस्थेने स्थापन केलेल्या कृत्रिम रेतन केंद्रावर झालेल्या कृत्रिम रेतन कार्याचा व त्यापासुन जन्मलेल्या संकरित / सुधारित वासरांचा केंद्रनिहाय डाटा, आयुक्त पशुसंवर्धन यांनी दिलेल्या विहित नमुन्यात ऑनलाईन ठेवणे बंधनकारक राहील.

१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी जे.के ट्रस्ट या संस्थेमार्फत या प्रकल्पांतर्गत जिल्हानिहाय स्थापन करावयाची कृत्रिम रेतन केंद्रे, प्रत्यक्षात स्थापन झालेली कृत्रिम रेतन केंद्रे, त्यांच्यामार्फत चालू महिन्यात व प्रागतीक गायी-म्हशींमधील केलेली कृत्रिम रेतने, गर्भतपासणी केलेल्या गायी-म्हशींची संख्या, गर्भतपासणीअंती गाभण गायी-म्हशींची संख्या, व्यालेल्या गायी-म्हशींची संख्या, जन्मलेली संकरित / सुधारित वासरे, प्रति वासरु जन्मासाठी लागलेली कृत्रिम रेतने याचा मासिक प्रगती अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सादर करावा व आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचा अहवाल त्यांच्या अभिप्रायासह पुढील महिन्याच्या १० तारेखेपर्यंत न चुकता दरमहा शासनास सादर करावा.

१३. या कार्यक्रमातील कृत्रिम रेतनाचे अभिलेख, कृत्रिम रेतनानंतर संकरित / सुधारित वासरांचा जन्म, जन्मलेल्या वासरांची सद्यस्थिती इत्यादीची ३ वर्षापर्यंत नोंद ठेवण्यासाठी आयुक्त पशुसंवर्धन यांनी संगणक प्रणाली तयार करावी व ही प्रणाली जे.के. ट्रस्ट या संस्थेद्वारे, पशुवैद्यक पदवी / पदवीकाधारक सुशिक्षित बेरोजगारांमार्फत तसेच, पशुसंवर्धन विभागातील संस्थांमार्फत केल्या जाणाऱ्या कृत्रिम रेतन कार्यासाठी सारखीच असावी.

१४. या प्रकल्पांतर्गत जे.के. ट्रस्ट या संस्थेचे एकूणच कामकाज समाधानकारक नसल्याचे आढळून आल्यास, आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे त्यांची या कार्यक्रमांतर्गत केलेली निवड शासन मान्यतेने तात्काळ संपुष्टात आणतील.

१५. जिल्हा पशूसंवर्धन उपायुक्त, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद व पशुधन विकास अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र यांच्या समितीने जिल्ह्यातील कार्यरत पशुवैद्यकीय संस्थांसाठी १००० पैदासक्षम गाई म्हशींच्या संख्येच्या मर्यादेत गावांचे कृत्रिम रेतन कार्यासाठी कार्यक्षेत्र निश्चित करावे. इतर गावांत कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करण्यासाठी प्रजननक्षम गाई / म्हशींच्या संख्येनुसार जे.के. ट्रस्ट या संस्थेच्या कृत्रिम रेतन केंद्रांचे आणि सेवादात्यांच्या कृत्रिम रेतन केंद्रांच्या मुख्यालयाचे ठिकाण व त्याचे कार्यक्षेत्र निश्चित करावे व त्यास आयुक्त

पशुसंवर्धन यांची मान्यता घेवून सदर केंद्रे कार्यान्वित करण्यात यावीत. असे करताना, स्वयंसेवी / सेवाभावी संस्थेमार्फत विविध योजनेंतर्गत चालू असलेली कृत्रिम रेतन केंद्रे वगळण्यात यावीत.

१६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद / जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त / प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांनी त्यांच्या दौऱ्याच्या वेळी जे.के. ट्रस्ट या संस्थेमार्फत केलेल्या कृत्रिम रेतन कार्याची तसेच, कृत्रिम रेतनानंतर जन्मलेल्या संकरित / सुधारित वासरांची रॅन्डम पध्दतीने १० टक्के पडताळणी करण्यात यावी. सदर पडताळणीचा अहवाल प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांनी दरमहा आयुक्त पशुसंवर्धन यांच्याकडे सादर करावा. त्याचपमाणे हा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांनी ऑनलाईन उपलब्ध होईल, असे पहावे.

१७. संदर्भीय शासन निर्णय दि. २० जून, २००९ अन्वये गठित केलेल्या राज्य सनियंत्रण समिती व जिल्हास्तरीय संनियंत्रण समितीद्वारे सदर प्रकल्पाचे संनियंत्रण करण्यात यावे.

१८. या प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी व प्रकल्पाची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरून सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

१९. हा प्रकल्प प्रभावीपणे राबविण्यासाठी कार्यक्षेत्रामधील बेरड वळुंचे खच्चीकरण करण्यासाठी जवळच्या पशुवैद्यकीय संस्थेमार्फत विशेष कार्य मोहिमांचे आयोजन करण्यात यावे.

२०. सदर प्रकल्प राबविताना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी योजनेची अंमलबजावणी / संनियत्रण आणि मुल्यमापन करताना आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य व महाराष्ट्र राज्य छोट्या शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांच्याशी आवश्यक तो समन्वय ठेवावा.

२१. या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारा निधी तात्काळ उपयोगात आणावा.

२२. सदर निधी उपयोगात आणताना राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीतील निर्णय व या योजने संदर्भात केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन त्यानुसार खर्च करण्यात यावा.

२३. या प्रकल्पांतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावे.

२४. कृत्रिम रेतन कार्याच्या नोंदीसाठी शेतकऱ्यांना / पशुपालकांना ए.आय. कार्ड देण्यात यावेत.

२५. प्रकल्प कालावधीत तसेच, प्रकल्प कालावधी संपल्यानंतर प्रकल्पाचे मुल्यमापन करण्यासाठी खालीलप्रमाणे मुल्यमापन समितीचे गठण करण्यात येत आहे. सदर समितीने सदर प्रकल्पाचा वेळोवेळी आढावा घेवून शासनास मुल्यमापन अहवाल सादर करावा.

**मुल्यमापन समिती :**

| | | |
|---|---|---|
| १. | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | सदस्य |
| ३. | सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| ४. | प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त नागपुर विभाग, नागपुर | सदस्य |
| ५. | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, औरंगाबाद | सदस्य |
| ६. | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड | सदस्य |
| ७. | पशुसंवर्धन उपायुक्त (नियोजन व अंदाज) | सदस्य सचिव |

तसेच, या प्रकल्पाचे मुल्यमापन नॅबकॉन, ॲग्रीकल्चर फायनान्स कॉर्पोरेशन इ. बाह्यसेवी संस्थेमार्फत सुध्दा करण्यात यावे व या संस्थेने केलेला मुल्यमापन अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२७१३०१३१०२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Machindra Apparao Pachpinde

Digitally signed by Machindra Apparao Pachpinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a6acbdcfb816875075a31b7754a1ac8c55c206e2845f9145cd34b586d977a703, cn=Machindra Apparao Pachpinde
Date: 2015.04.27 13:18:54 +05'30'

**(डॉ. एम. ए. पाचपिंडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

४. अवर सचिव, मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय
५. मा. अतिरिक्त मुख्य सचिव (कृषि व पणन) यांचे स्वीय सचिव
६. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. उपसचिव (राकृवियो) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.जिल्हाधिकारी, सर्व
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१२.अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
१४.उपसचिव (दुग्ध) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सर्व विभाग
१६.जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सर्व
१७.विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे / नागपूर/ औरंगाबाद (हर्सुल)
१८. अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
१९.जिल्हा दुग्धव्यवसाय अधिकारी, सर्व
२०.जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
२१.जे.के. ट्रस्ट, पोखरण रोड क्र. १, जे.के. ग्राम, ठाणे.
२२.पशुधन विकास अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र, सर्व
२३.अवर सचिव पदुम-३, कार्यासन अधिकारी, पदुम-१ / १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४.निवड नस्ती.

## <u>परिशिष्ट -अ</u>

**Rashtriya Kirshi Vikas Yojana – Strengthening of A.I. Delivery System**

**Proforma for Calf Born Certificate**

I, the undersigned---------------- (Name of the A.I. Worker) i/c of the A.I. Centre ------------------ (Name of the village), Taluka Dist… do hereby certify that, I have personally verified the birth of the crossbred / upgraded male / female, cow/ buffalo calf, which has been born out of the Artificial Insemination carried out by me. The details are as mentioned below :

a) Name of the Owner of the cow /buffalo----

b) Address of the owner

c) Details of Artificial Insemination performed on the cow / buffalo under reference

(Details of semen used of the sire
i.e. bull no. blood level etc.)

Ist A.I. (date)
IInd A.I. (date)
IIIrd A.I. (date)

a. Date of birth of the crossbred /upgraded, cow/ buffalo calf -----------
b. Sex of the crossbred /upgraded, cow/ buffalo calf -----------
c. Tag No. of the ear tag affixed -----------
d. Photograph of the calf along with the owner (attached)

Date ----------
Place ---------

sd/-
(Name of the A.I. Owner)

<u>Verification</u>

I, the undersigned---------------- (Name & designation of technical officer / servant of A.H. Dept.) certify that, I have personally visited the house / farm of the owner on date -------- whose details are mentioned above. I have also verified the crossbred / upgraded, cow / buffalo calf whose description is shown as above. To the best of my knowledge and experience, the said crossbred /upgraded, cow/ buffalo calf is found to be the result of the A.I. performed by -------------- (Name of A.I. Worker) -------------- of the ----------- A.I. Centre, Taluka ----------------- Dist.

Date ----------
Place ---------